सेवायोजन कार्यालय.

शासनाच्या चतुर्थ श्रेणीतील निवृत्त कर्मचा-यांच्या मुलास/अविवाहीत मुलीस शासनाच्या सेवेत नोकरीसाठी सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट रद्द करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-आरटीआर-१०८०/८१९/१२,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १४ एप्रिल, १९८१

# प रि प त्र क

सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीआर-१०६८/सी/१००९१ दिनांक २ डिसेंबर, १९६८ च्या शासन परिपत्रकानुसार तृतीय व चतुर्थ श्रेणीतील एक महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरिता भरण्यात येणा-या पदांवर सेवायोजन कार्यालयाने पुरस्कृत केलेल्या उमेदवारांतूनच नेमणूक करावी असे बंधन आहे. प्रस्तुत आदेश शिथिल करुन चतुर्थ श्रेणीतील निवृत्त कर्मचारी अथवा या श्रेणीतील एक वर्षाच्या कालावधीमध्ये निवृत्त होणारे कर्मचारी यांच्या मुलास/अविवाहित मुलीस शासन सेवेतील चतुर्थश्रेणी पदावरील नोकरीसाठी विशेष बाब म्हणून सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट खालील शर्तीवर रद्द करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

१] उमेदवारांनी चतुर्थ श्रेणीतील पदांकरिता विहित करण्यात आलेल्या सेवा प्रवेश नियमातील शैक्षणिक अर्हता, वय या अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

२] चतुर्थ श्रेणीतील निवृत्त किंवा एक वर्षाच्या कालावधीमध्ये निवृत्त होणा-या कर्मचा-यांच्या फक्त एका मुलास किंवा अविवाहित मुलीस फक्त चतुर्थ श्रेणीतील पदांवरील नेमणुकीकरिता सेवा योजन कार्यालयाच्या शिफारशीची अट रद्द करण्याची सवलत दिली जाईल.

[ कृ. म. पहा...२/-]

३] सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट जरी रद्द करण्यात आली असली तरी अर्जदार उमेदवाराने अर्ज करण्यापूर्वी आपले नाव स्थानिक सेवायोजन कार्यालयामध्ये नोंदणी करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
विशेष सचिव [सेवा], महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई [पत्राने],
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
निबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
संचालक, सेवा योजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या अखत्यारीमधील सर्व विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख.